**वृत्तपत्रांच्या व नियतकालिकांच्या जाहिरातविषयक धोरणात तसेच जाहिरातीच्या दरात सुधारणा करण्यासाठी नेमलेल्या मा. अनिल देशमुख समितीचा अहवाल.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. पीयुबी-२००५/३००/प्र.क्र.५०/३४**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- १ जून २००५**

**वाचा** :-
१) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.पीयुबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४, दिनांक १/५/२००१
२) शासन शुध्दीपत्रक सा.प्र.वि. क्र.पीयुबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४, दिनांक ८/८/२००१
३) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.पीयुबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४, दिनांक १९ /१२/२००१
४) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.पीयुबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४, दिनांक ७ /५/२००२

**शासन निर्णय :-**

जाहिरात धोरणासाठी निर्गमित केलेल्या दि. १ मे २००१ च्या शासन निर्णयातील नियमावलीची अमलबजावणी करत असताना अन्य काही अडचणी निर्माण झाल्यामुळे उपरोक्त शासन निर्णयातील काही नियमांमध्ये खालीलप्रमाणे बदल करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

१) दि. १ मे २००१ च्या शासन निर्णयातील नियम ५-ई नुसार स्थापत्य स्वरुपाच्या जाहिराती वगळून इतर प्रकारच्या जाहिराती संबंधित विभागाने सुचविलेल्या वर्गांना प्राधान्याने वितरित करण्यात येतील असा उल्लेख आहे. त्यामुळे काही विभागाकडून इतर प्रकारच्या जाहिराती फक्त "अ" वर्ग वृत्तपत्रांनाच देण्याबाबत सूचित करण्यात येते आणि उक्त नियमातील तरतुदीनुसार ती फक्त "अ" वर्ग वृत्तपत्रांनाच वितरित करण्यात येते. त्यामुळे नियम ३-ब मधील तरतुदीचे पालन करणे शक्य होत नाही. याचा विचार करुन नियम ५-ई मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

कृ.मा.प....२)

**नियम ५-ई या नियमात बदल असा राहील :-**

इतर प्रकारच्या जाहिराती संबंधित विभागाने सुचविलेल्या वर्गाबरोबरच त्या विभागातील सुचविलेल्या वर्गाच्या खालील वर्गातील एका दैनिकाला वितरित करण्यात येतील.

२) दि. १ मे, २००१ च्या शासन निर्णयातील नियत ५-फ मध्ये वृत्तपत्र कोणत्या भाषेचे असावे याबद्दल संबंधित विभागाची शिफारस लक्षात घेतली जाईल असा उल्लेख आहे. राज्याच्या सर्वच विभागात इंग्रजी वृत्तपत्रे यादीवर नसल्याने विशिष्ट भागातील इंग्रजी वृत्तपत्रांना मिळणाऱ्या जाहिरातीचे प्रमाण कधी-कधी मराठी, हिंदी व इतर भाषेतील वृत्तपत्रांपेक्षा जास्त रहाते. याचा विचार करुन उक्त नियमात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**नियम ५-फ या नियमात बदल असा राहील :-**

संबंधित विभागाने ज्या वर्गातील इंग्रजी वृत्तपत्राची मागणी केली असेल, त्या विभागात त्या वर्गातील इंग्रजी वृत्तपत्र नसेल किंवा त्या विभागात सुचविलेल्या वर्गातील एकच इंग्रजी वृत्तपत्र असेल, अशा वेळी ती जाहिरात त्या विभागातील व त्याच वर्गातील अन्य भाषिक वृत्तपत्रातून देण्याचा अधिकार महासंचालनालयास राहील.

३) बऱ्याच वृत्तपत्रानी एबीसी या संस्थेचे सभासदत्व घेण्यास नकार दिला असल्याने वृत्तपत्राचा खप ५०,००० प्रतींपेक्षा जास्त असून देखील त्या वृत्तपत्रांचा "अ" वर्गात समावेश करता येत नाही. याचा विचार करुन दि. १ मे २००१ च्या शासन निर्णयातील नियम ११-ब मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**नियम ११-ब या नियमात बदल असा राहील :-**

ज्या वृत्तपत्राकडे ए.बी.सी. प्रमाणपत्र नसेल आणि अशा वृत्तपत्राने त्यांच्या वृत्तपत्राचा खप ५०,००० पेक्षा जास्त असल्याचे सनदी लेखापालाचे (चार्टड अकाऊंटंट) प्रमाणपत्र दिले असेल अशा प्रकरणी दि. १ मे २००१ च्या शासन निर्णयातील नियम ११-ड व ११-ई प्रमाणे तपासणी करण्यात येईल. तपासणीनंतर संबंधित वृत्तपत्राचा खप ५०,००० पेक्षा अधिक आहे असे आढळल्यास उक्त शासन निर्णयातील नियम ९-अ प्रमाणे नियुक्त समितीची मान्यता घेऊन सदर वृत्तपत्राचा "अ" वर्ग जाहिरात यादीत समावेश करण्यात येईल. मात्र उक्त निर्णयातील नियम ११-ब अन्वये देण्यात येणारा मूळ दराच्या २५% अधिक दर त्यांना लागू होणार नाही.

४) शासन निर्णय दि. १ मे २००१ मधील नियम १३ (४) स्.प्ताहिके या नियमानुसार साप्ताहिक वृत्तपत्रांसाठी ३६ सें.मी. x २३ सें.मी.आकारातील प्रत्येक पृष्ठावर किमान ४ कॉलम असलेली ४ पृष्ठे एकूण मजकूर किमान ५४० कॉ.सें.मी. असल्यास त्या प्रकाशनास साप्ताहिक म्हणून मान्यता देण्याची

......३)

तरतूद आहे. मात्र वरील आकारापेक्षा कमी आकारात अनेक दर्जेदार व जास्तीच्या खपाची प्रकाशने प्रसिद्ध होत आहेत. अशा वृत्तपत्रांना नियमातील तरतुदीनुसार शासनमान्य यादीत समाविष्ट करणे शक्य होत नाही. याचा विचार करुन नियम १३ (४) मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**नियम १३ (४) या नियमात बदल असा राहील :-**

१९.५ सें.मी. x २५.५ सें.मी.च्या किंवा तत्सम आकारातील किमान १६ पृष्ठे असणाऱ्या साप्ताहिकांचा शासनमान्य यादीमध्ये समावेश करण्यात येईल.

५) शासन निर्णय दि. १ मे, २००१ च्या नियम १५-अ मधील अनु.क्र.१ - "क" वर्ग दैनिकासाठी किमान व कमाल खपाचे निकष अनु.क्र.२ मध्ये विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणाहून प्रसिद्ध होणाऱ्या दैनिकासाठी किमान खप ठरविण्यात आला आहे. विभागीय महसूल विभाग आणि माहिती व जनसंपर्क विभागीय मुख्यालय भिन्न असल्याने विभागीय मुख्यालयाचे ठिकाण स्पष्ट होण्यासाठी नियम १५-अ अनु.क्र.१ "क" वर्ग दैनिके - निकष क्र.२ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**नियम १५-अ अनु.क्र.१ "क" वर्ग दैनिके निकष क्र.२ या नियमात असा बदल राहील :**

माहिती व जनसंपर्क विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणाहून प्रसिद्ध होणाऱ्या दैनिकासाठी किमान खप ३००१ ते २०,००० प्रती एवढा असणे आवश्यक आहे.

६) शासन निर्णय दि. १ मे २००१ मधील नियम १६-इ अन्वये विशेषांकासाठी दर्शनी जाहिरात व खास प्रयोजनाची निश्चिती करण्यात आलेली आहे.

**नियम १६-इ या नियमात बदल असा राहील :-**

नियम १६-इ मध्ये नमूद केलेल्या प्रयोजना व्यतिरिक्त शासन वेळोवेळी जे प्रसंग किंवा दिवस अथवा महिना जाहिरातीसाठी निश्चित करेल, असे प्रसंग/दिवस/महिना या नियमात अंतर्भूत असतील.

७) शासन निर्णय दि. १ मे २००१ च्या नियम १६-प व शासन शुद्धीपत्रक दि.८ ऑगस्ट २००१ च्या परिच्छेद ३ (७) वरील नियमांच्या अधिकारानुसार मा.राज्यमंत्री/मंत्री/मुख्यमंत्री शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांनाही त्यांच्या अधिकारातील मूल्यांच्या जाहिराती मंजूर करतात, याचा विचार करता नियम १६-प मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**नियम १६-प या नियमात बदल असा राहील :-**

शासन निर्णय दि. १.५.२००१ व दि. ८.८.२००१ च्या शासन शुद्धीपत्रकातील तरतूद शासनमान्य यादीत असलेल्या/नसलेल्या सर्व वृत्तपत्रांसाठी लागू आहे, हे स्पष्ट करण्यात येत आहे.

.....४)

८) शासन निर्णय दि. १ मे, २००१ मधील नियम १८ - स्मरणिका - या नियमानुसार एका आर्थिक वर्षात एका संस्थेच्या फक्त एकाच स्मरणिकेला रु. २,०००/- मूल्यापर्यंतची जाहिरात मंजूर करता येते. मात्र मा. राज्यमंत्री (मा. व ज.)/मंत्री/मुख्यमंत्री काही संस्थांच्या स्मरणिकेसाठी उक्त शासन निर्णयातील मूल्याहून अधिक मूल्याच्या जाहिरातींची शिफारस करतात याचा विचार करुन नियम १८ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**नियम १८ या नियमात बदल असा राहील :-**

स्मरणिकेसाठी जाहिरात मंजूर करण्याचे अधिकार दि. १ मे २००१ च्या शासन निर्णयातील नियम १६ प नुसार राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( भूषण गगराणी )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे सचिव/उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२,(लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
संचालक (माहिती), मुख्यालय मुंबई/औरंगाबाद/नागपूर-अमरावती,
उपसंचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
उपसंचालक (माहिती), नाशिक, पुणे, लातूर, अमरावती, कोकण व कोल्हापूर विभाग,
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
सर्व उप माहिती कार्यालये,
**निवड नस्ती.**